सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक-सकबो-२०१९/प्र.क्र.३२/का-१०**

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख-२३ मार्च, २०२०.

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०१९.
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९.
३. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.सकबो-२०१९/प्र.क्र.३२/का-१०, दि.२४ एप्रिल, २०२०.
४. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.सकबो-२०१९/प्र.क्र.३२/का-१०, दि.९ जानेवारी, २०२०.
५. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.१३ मार्च, २०२०.

**प्रस्तावना :-**

सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी २२३५ बी ९४२ या संगणक संकेतांकाखाली ३६ सहायक अनुदाने (वेतन) बाबीसाठी ₹ १,०७,४१,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी सात लक्ष एक्केचाळीस हजार फक्त) इतके सुधारित अंदाज निश्चित करण्यात आले आहे. सदर निधीपैकी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डाच्या कर्मचाऱ्यांचे वेतन व सातव्या वेतन आयोगानुसार फरकाची रक्कम अदा करण्यासाठी आवश्यक असलेला ₹ ३१,७८,०००/- (अक्षरी रुपये एकतीस लक्ष अठ्ठयाहत्तर हजार फक्त) इतका निधी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डाच्या कर्मचाऱ्यांचे वेतन व सातव्या वेतन आयोगानुसार फरकाची रक्कम अदा करण्यासाठी **₹ ३१,७८,०००/- (अक्षरी रुपये एकतीस लक्ष अठ्ठयाहत्तर हजार फक्त)** इतका निधी या शासन निर्णयाव्दारे वितरीत करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डातील कर्मचाऱ्यांच्या सातव्या वेतन आयोगाचा फरक हा केंद्रीय समाजकल्याण बोर्डाकडून फरकाचा निधी प्राप्त झाल्यानंतरच अदा करण्याची दक्षता घ्यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड, मुंबई यांनी घ्यावी.

४. सदर खर्च सन २०१९-२० या वित्तीय वर्षात मागणी क्र.एक्स-१, योजनेत्तर, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण १०२, बाल कल्याण (०२) (०४) महाराष्ट्र राज्य समाजकल्याण मंडळाला सहायक अनुदान (२२३५ बी ९४२ ) या लेखाशिर्षांतर्गत ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाकरिता अर्थसंकल्पित वितरीत तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर निधी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास वितरित करण्यासाठी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९ रोजीच्या परिपत्रकातील परिच्छेद क्र.४ ते १९ मधील मार्गदर्शक सूचना व त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.१३ मार्च, २०२० रोजीच्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००३२७१४५६३३९४३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA SITARAM JARANDE

Digitally signed by RAVINDRA SITARAM JARANDE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=186d0f0fdd27c79b9b3f859a90ec537946c37d5876e64ce525d082e58e494c85, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA, serialNumber=4d2dc3dbd5c0f35a66a84c93b4cead367c64cc2bc9d7391e9a053988a2f81b64, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA SITARAM JARANDE
Date: 2020.03.27 14:59:40 +05'30'

**( र.सि.जरांडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड, चेंबूर, मुंबई-७१
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
११. निवड नस्ती, का-१०.